राज्यातील आर्थिकदृष्टया आजारी/ अवसायानात असलेले सहकारी साखर कारखाने व त्याची उपांगे भागीदारी/ सहयोगी / भाडेतत्त्वावर चालविण्यास देण्याबाबत निकष निश्चित करणेबाबत..(शुध्दीपत्रक)

# महाराष्ट्र शासन

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन शुध्दीपत्रक क्रमांक : ससाका-२०१९/प्र.क्र.१०५/३-स**

मंत्रालय विस्तार, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०८ सप्टेंबर, २०२०.

वाचा :-

१) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका-१००५/प्र.क्र.१७९/३-स, दिनांक २०.१०.२००५.
२) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका-१००५/प्र.क्र.१७९/३-स, दिनांक २३.११.२००५.
३) शासन पूरकपत्र सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका-१००५/प्र.क्र.१७९/३-स, दिनांक २९.११.२००५.
४) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका-१००५/प्र.क्र.१७९/३-स, दिनांक १५.२.२०१३.
५) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका-२०१५/प्र.क्र.२१५/३-स (शिकाना), दिनांक ६.१२.२०१६.
६) शासन शुध्दीपत्रक सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक : ससाका-२०१९/ प्र.क्र.१०५/ ३-स, दिनांक २.७.२०२०.
७) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक : ससाका-२०१९/ प्र.क्र.१०५/ ३-स, दिनांक ४.९.२०२०.

**शुध्दीपत्रक :**

राज्यातील आर्थिकदृष्टया आजारी/ अवसायानात असलेले सहकारी साखर कारखाने व त्याची उपांगे भाडेतत्त्वावर / सहभागीदारी/ सहयोगी तत्त्वावर चालविण्यास देण्याबाबतचे निकष ठरविण्याबाबतच्या वाचा मधील क्रमांक ७ मध्ये नमूद शासन निर्णयासोबतचे जोडपत्र अ, ब, क, ड, इ व ई ऐवजी सुधारीत जोडपत्र **अ, ब, क, ड, इ व ई** जोडण्यात आले आहेत. त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

२. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२००९०८१७०४३२८१०२ असा आहे. हे शासन शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Ramesh Pimpale

Digitally signed by Prashant Ramesh Pimpale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fa29ab2a9a96d3a62a7a97531711f1ef9f3e78de039be6cabb44929032069507, serialNumber=c9fc0e76e90819f7f6d29d043a3e393d7982322683a082d04eda26b7264e4837, cn=Prashant Ramesh Pimpale
Date: 2020.09.08 17:12:35 +05'30'

**सोबत : जोडपत्र अ, ब, क, ड, इ व ई**

**( प्रशांत र. पिंपळे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री (सहकार, पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद.
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा.
७. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (सहकार), मंत्रालय, मुंबई.
९. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. सर्व प्रादेशिक सहसंचालक (साखर).
११. अध्यक्ष/ कार्यकारी संचालक, महाराष्ट्र सहकारी बँक मर्यादित, मुंबई.
१२. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखाना संघ मर्यादित, नरीमन पॉईंट, मुंबई.
१३. निवड नस्ती ( ३-स).

**शासन शुध्दीपत्रक सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक : ससाका-२०१९/प्र.क्र.१०५/३-स, दिनांक ८.९.२०२० सोबतचे "जोडपत्र - अ"**

सहकारी साखर कारखाने भाडेतत्वावर (Lease) देण्याबाबत अटी/ निकष व कार्यपद्धती खालीलप्रमाणे :-

**१. खालील वर्गातील कारखाने भाडेतत्वावर देण्यात यावेत.**

**१.१) आर्थिकदृष्टया आजारी असलेले सहकारी साखर कारखाने खालील पैकी दोन निकषात बसल्यास भाडेतत्वावर देण्यास पात्र राहतील :**

अ) मागील सलग ३ आर्थिक वर्षे संचित तोटा असणे.

आ) मागील सलग ३ आर्थिक वर्षे उणे नक्त मूल्य असणे.

इ) बाहेरील कर्ज मर्यादा उभारणी मर्यादा संपुष्टात आलेली असणे.

ई) मागील सलग ३ आर्थिक वर्षे लेखापरीक्षण वर्ग क किंवा ड असणे.

उ) गत तीन हंगामात क्षमतेपेक्षा ५०% पेक्षा कमी गाळप झाले असणे.

ऊ) शासकीय अर्थसहाय्याची थकबाकी असणे.

**१.२) अवसायनात असलेले सहकारी साखर कारखाने :**

अवसायनात असलेले सहकारी साखर कारखाने भाडेतत्वावर देण्यास पात्र राहतील.

**२. सहकारी साखर कारखाना भाड्याने घेणाऱ्या सहकारी/ खाजगी साखर कारखाना अथवा कंपनी, भागीदारी संस्था इ. नी प्रतिवर्षी खालीलप्रमाणे निश्चित भाडे देणे आवश्यक राहील.**

| अ.क्र. | दैनिक क्षमता TCD | खान्देश व विदर्भ | मराठवाडा विभाग | पश्चिम महाराष्ट्र |
|---|---|---|---|---|
| १. | १२५० ते २५०० | रु.५० लाख | रु.१ कोटी | रु.१.५ कोटी |
| २. | २५०० ते ५००० | रु.१ कोटी | रु.२ कोटी | रु.३ कोटी. |
| ३. | ५००० ते ७५०० | रु.१.५ कोटी | रु.२.५कोटी. | रु.३.५ कोटी. |
| ४. | ७५०० ते १२००० | रु.२ कोटी. | रु.३ कोटी. | रु.४ कोटी. |

**३. कारखाना भाडेतत्वावर द्यावयाचा कालावधी :**

सहकारी साखर कारखाना भाडेतत्वावर देताना भाडेकराराचा कालावधी किमान ५ व कमाल १५ वर्षापर्यंत राहील.

**४. कारखाना कोणास भाडेतत्वावर घेता येईल?**

सहकारी साखर कारखाने, खाजगी साखर कारखाने, कंपनी, भागीदारी संस्था इत्यादींना ई-निविदेमध्ये सहभागी होता येईल. कारखाना भाडेतत्वावर देताना सहकारी साखर

कारखान्यांना प्रथम प्राधान्य राहील. निविदेमधील इतर स्पर्धकांचा दर जास्त असल्यास सहकारी साखर कारखान्यास त्या दराची बरोबरी करण्याची संधी राहील.

**५. कारखाना भाडेतत्वावर देण्याची कार्यपध्दती :**

५.१) वरील नमूद निश्चित प्रतिवर्षाच्या भाड्याशिवाय प्र. मे. टन गाळपावर भाडे आकारणीनुसार कारखान्याने ई- निविदा मागवाव्यात.

५.२) कारखाना भाडेतत्वावर देताना ई-निविदा प्रक्रिया राबविणे आवश्यक राहील.

५.३) ई-निविदेमध्ये किमान प्रतिवर्षी निश्चित भाडे, प्र. मे. टन गाळपावरील रक्कम, अनामत रक्कम, कराराची मुदत इ. बाबींचा उल्लेख आवश्यक राहील.

५.४) अनामत रक्कम म्हणून भाडेतत्वावर घेणाऱ्या कारखान्यास/ कंपनीस वर नमूद केलेल्या एक वर्षाच्या निश्चित भाड्याइतकी रक्कम कारखान्याकडे बिनव्याजी जमा करावी लागेल अथवा तेवढ्या रक्कमेची बँक गॅरंटी द्यावी लागेल.

५.५) भाडेतत्वावर घेणा-या कारखान्यांने/ कंपनीने दरवर्षीचे भाड्याच्या ५०% रक्कम गळीत हंगाम सुरु होण्यापूर्वी व उर्वरित ५०% रक्कम हंगाम सुरु झाल्यानंतर ३ महिन्यात भरणे बंधनकारक राहील.

५.६) कोणत्याही कारणास्तव कारखान्यास गाळप हंगाम घेता आला नाही तरीही प्रतिवर्षीचे निश्चित भाडे भरण्याचे बंधन कारखान्यावर राहील. ती रक्कम न भरल्यास अनामत रक्कमेतून रक्कम जप्त करण्यात येईल व भाडेकरार संपुष्टात आणण्यात येईल.

५.७) भाडेकराराच्या मुदतीत मिळालेले भाडे कारखान्याने शासकीय देणी, वित्तीय संस्थांच्या मुद्दलाची परतफेड करणे तसेच जुनी कामगार देणी व शेतकऱ्यांची देणी यासाठी वापरावे.

**६. वित्तीय संस्थांची मान्यता :**

कारखाना भाडेतत्वावर देण्यासाठी सर्व धनको संस्थांची (सिक्यूअर्ड क्रेडिटर्स) मान्यता घेवून ई-निविदा काढणे आवश्यक राहील.

**७. भाडेकराराची मुदत संपल्यानंतर संस्थांचे पुनर्जीवन :**

७.१) अवसायकाने भाडेकराराची मुदत संपताच शक्य असल्यास कलम १९ प्रमाणे कारखान्याचे पुनर्जीवन करणेबाबत कार्यवाही करावी. कारखान्याचे पुनर्जीवन शक्य नसल्यास कारखान्याची मालमत्ता विक्री करावी व अवसायनाचे कामकाज पूर्ण करावे अथवा शासनाच्या सहमतीने परत भाडेतत्वावर कारखाना देणेबाबत निर्णय घ्यावा.

७.२) कारखाना विक्री करताना अथवा दुसऱ्यांदा कारखाना भाडेतत्वावर देताना कारखाना चालविण्यास घेतलेल्या कारखान्यास/ कंपनीला मालमत्ता खरेदीसाठी प्राधान्य द्यावे.

*************

**शासन शुध्दीपत्रक सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक : ससाका-२०१९/प्र.क्र.१०५/३-स, दिनांक ८.९.२०२० सोबतचे "जोडपत्र- ब"**

**सहकारी साखर कारखाना भागीदारी तत्वावर (Partnership) करण्याबाबतच्या अटी/ निकष व कार्यपध्दती (महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम २० नुसार)**

**१. कारखान्याने भागीदारी करण्यासाठीची कार्यवाही :**

१.१) कोणत्याही दोन किंवा अधिक सहकारी साखर कारखान्यांना साखर आयुक्त यांच्या पूर्वमंजूरीने व अशा प्रत्येक कारखान्याच्या सर्वसाधारण सभेस हजर असलेल्या व मत देणाऱ्या सभासदांपैकी तीन चतुर्थांश सभासदांच्या बहुमताने संमत केलेल्या ठरावाद्वारे कोणताही विशिष्ट धंदा किंवा कोणतेही विशिष्ट धंदे चालविण्यासाठी भागीदारीचा करार करता येईल.

१.२) प्रत्येक सभासदास अशा सर्वसाधारण सभेत घेण्यात येणाऱ्या ठरावाची व बैठकीच्या दिनांकाची पूर्ण दहा दिवसांची लेखी नोटीस देणे संस्थेस आवश्यक राहील.

**२. कारखान्याने भागीदारी करण्यासाठीची मान्यता :**

ज्या सहकारी साखर कारखान्याने भागभांडवल, कर्ज किंवा हमी या स्वरुपात शासनाकडून कोणतेही वित्तिय सहाय्य घेतलेले नसेल अशा कारखान्याच्या बाबतीत अशी भागीदारी करण्यासाठी निबंधकाच्या पूर्वमंजूरीची आवश्यकता असणार नाही.

**३. भारतीय भागीदारी अधिनियम, १९३२ मधील कोणतीही गोष्ट अशा भागीदारीस लागू होणार नाही.**

**४. कारखान्याने भागीदारी करणेबाबतचा प्रस्ताव :**

सहकारी साखर कारखाना भागीदारी करण्यासाठी Expression of Interest जाहीर करील किंवा कारखाना इतर कारखान्याशी संपर्क करुन प्रस्ताव तयार करु शकेल.

**५. कारखान्याने भागीदारी करावयाचा कालावधी :**

सहकारी साखर कारखान्याने दुसऱ्या सहकारी साखर कारखान्याशी भागीदारी करताना किमान ५ व कमाल १५ वर्ष कालावधी राहील.

**६. सहकारी साखर कारखान्याने भागीदारी करावयाची कार्यपध्दती :**

६.१) सहकारी साखर कारखान्याने भागीदारी करताना लेखापरिक्षक यांनी प्रमाणित केलेल्या आर्थिक पत्रकांनुसार कारखान्याकडे असलेले एकूण दायित्व (Total Liability) [उदा. वित्तीय संस्थेकडील कर्ज, शासकीय भागभांडवल व कर्ज, देय थकीत ऊस दर, ऊस खरेदी कर व इतर शासकीय देणी इ.] सह कारखान्याकडील उपपदार्थ प्रकल्प विचारात घेवून आणि कारखाना चालू करणेसाठी करावी लागणारी आर्थिक गुंतवणूक याचा विचार करुन

कारखान्याने वित्तीय सल्लागार संस्थेकडून 'Financial Model' तयार करावे. फायनान्सियल मॉडेल तयार करताना शेवटच्या तिमाही अखेरची (Last Financial Quarter Ending) लेखापरिक्षकाने प्रमाणित केलेल्या आर्थिक पत्रकानुसार आकडेवारी विचारात घेणे आवश्यक राहील. सदर Financial Model मध्ये वित्तीय सल्लागार संस्थेने सदर प्रकल्पासाठी 'pay back period' विचारात घेवून भागीदारी कराराचा कालावधी नमूद करणे आवश्यक राहील.

६.२) कारखान्याचा प्रस्ताव आर्थिकदृष्टया सक्षम (Financially Viable) असणे आवश्यक आहे.

६.३) सहकारी साखर कारखाना भागीदारीने चालविण्याबाबतच्या प्रस्तावासोबत परिपूर्ण योजना, संबंधित संस्थेची योजनेत सहभागी होण्यासाठीची लेखी सहमती, वित्तिय संस्थेची लेखी सहमती, संबंधित संस्थेची सनदी लेखापालांकडून [Chartered Accountant] प्रमाणित करण्यात आलेली आर्थिक पत्रके, आयकर विवरण पत्रके, आर्थिक ऐपतदारी प्रमाणपत्र, प्रस्तावित योजनेमध्ये स्विकारावयाची जबाबदारी/ करावयाची गुंतवणुक, अशी गुंतवणुक करण्याकरिता उभारावयाचा निधी व त्याकरिता संबंधितांनी मिळविलेली वित्तिय संस्थेची लेखी हमी इ. बाबींचा तपशिल प्रस्तावासोबत सादर करणे आवश्यक आहे.

६.४) कारखाना भागीदारीने चालवण्याचा प्रस्ताव अंतिम मान्यतेसाठी शासन निर्णयानुसार नियुक्त समितीकडे सादर केल्यानंतर सदर प्रस्तावावर समितीने घेतलेल्या निर्णयाप्रमाणे व त्याबाबत नमूद अटी व शर्तीनुसार साखर आयुक्तालयाचे स्तरावर करार करण्यास मान्यता देण्यात येईल. तसेच ज्या सहकारी साखर कारखान्यास भागीदारी करावयाची आहे, अशा कारखान्याने प्राधान्याने शासकीय थकीत देणी भरणा करणे आवश्यक आहे. तथापि, अशी रक्कम एकरकमी भरणे शक्य नसल्यास विहित कालावधीमध्ये रक्कम भरणेबाबत कारखान्याने हमीपत्र द्यावे.

६.५) सहकारी साखर कारखान्यांनी अधिनियमातील तरतूदी व वरील अटी-शर्तीचे पालन न करता परस्पर त्यांचे स्तरावर सामंजस्य करार (MOU) करुन भागीदारीने सहकारी साखर कारखाना चालविण्याचा निर्णय घेतल्यास होणारे आर्थिक नुकसान आणि अधिनियमाचे उल्लंघन या बाबतची संपूर्ण जबाबदारी ही संचालक मंडळ आणि कार्यकारी संचालक यांची राहील.

**७. कारखान्यातील कर्मचारी :**

कारखाना भागीदारीने चालविणाऱ्या कारखान्यास आकृतीबंधाप्रमाणे कर्मचारी घेण्याची मुभा राहील.

***************

**शासन शुध्दीपत्रक सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक : ससाका-२०१९/प्र.क्र.१०५/३-स, दिनांक ८.९.२०२० सोबतचे "जोडपत्र- क"**

**सहकारी साखर कारखाना सहयोग तत्वावर (Collaboration)करण्याबाबतच्या अटी/ निकष व कार्यपध्दती (महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम २०-ए नुसार)**

**१. सहकारी साखर कारखान्याने सहयोग करण्याबाबतची कार्यवाही :**

१.१) कोणत्याही सहकारी साखर कारखान्यास औद्योगिक गुंतवणूक, वित्तिय सहाय्य अथवा पणन व व्यवस्थापन तज्ञ सेवा यासह कोणताही विशिष्ट धंदा किंवा धंदे चालविण्यासाठी कोणत्याही शासकीय उपक्रमाशी किंवा राज्य शासनाने मान्यता दिलेल्या कोणत्याही उपक्रमाशी राज्य शासनाच्या पूर्वमान्यतेने (आणि राज्य शासन लादेल अशा अटी आणि शर्ती यांना अधीन राहून व विहित करील अशा रीतीने) सहयोग करता येईल.

१.२) कोणत्याही साखर कारखान्याकडून केल्या जाणाऱ्या सहयोगाच्या परियोजनेस मान्यता देण्यापूर्वी खालील गोष्टींचा यथायोग्य विचार करण्यात यावा.

(अ) परियोजना आर्थिकदृष्टया सक्षम असावी.

(ब) संबंधित साखर कारखान्याच्या सहकारी स्वरुपाला कोणत्याही प्रकारे बाधा न येता, परियोजनेची अंमलबजावणी करता यावी.

(क) ती परियोजना संबंधित कारखान्याच्या सभासदांच्या हितास पोषक असावी, सार्वजनिक हिताची असावी आणि एकंदरीत सहकारी चळवळीला हितकारक असावी.

**२. कारखान्याने भागीदारी करणेबाबतचा प्रस्ताव :**

ज्या संस्थेने भाग भांडवल, कर्ज किंवा हमी या स्वरुपात शासनाकडून कोणतेही वित्तिय सहाय्य घेतलेले नसेल अशा संस्थेच्या बाबतीत राज्य शासनाच्या पूर्वमंजूरीची आवश्यकता असणार नाही. तथापि वरील अ, ब, क ची पूर्तता होत असल्यास सर्वसाधारण सभेच्या मान्यतेने कारखाना सहयोगी तत्वावर देता येईल.

**३. कारखान्याने भागीदारी करण्यासाठीची मान्यता :**

सहकारी साखर कारखाना सहयोग करण्यासाठी Expression of Interest जाहीर करेल किंवा कारखाना शासकीय उपक्रमाशी अथवा शासनाने मान्यता दिलेल्या उपक्रमाशी संपर्क करुन प्रस्ताव तयार करु शकेल.

**४. कारखान्याने सहयोग करण्याचा कालावधी :**

सहकारी साखर कारखाने सहयोग करण्याचा कालावधी किमान ५ व कमाल १५ वर्षापर्यंत राहील.

**५. सहकारी साखर कारखान्याने सहयोग करण्याबाबतची कार्यपद्धती :-**

१) सहकारी साखर कारखाने दिर्घ मुदतीवर सहयोग करताना लेखापरिक्षक यांनी प्रमाणित केलेल्या आर्थिक पत्रकांनुसार कारखान्याकडे असलेले एकूण दायीत्व (Total Liability) उदा. वित्तीय संस्थेकडील कर्ज, शासकीय भागभांडवल व कर्ज, देय थकीत ऊस दर, ऊस खरेदी कर व इतर शासकीय देणी इ. सह कारखान्याकडील उपपदार्थ प्रकल्प विचारात घेवून आणि कारखाना चालू करणेसाठी करावी लागणारी आर्थिक गुंतवणूक याचा विचार करुन कारखान्याने वित्तीय सल्लागार संस्थेकडून 'Financial Model' तयार करावे. फायनान्सियल मॉडेल तयार करताना शेवटच्या तिमाही अखेरची (Last Financial Quarter Ending) लेखापरिक्षकाने प्रमाणित केलेल्या आर्थिक पत्रकानुसार आकडेवारी विचारात घेणे आवश्यक राहील. सदर Financial Model मध्ये वित्तीय सल्लागार संस्थेने सदर प्रकल्पासाठी 'pay back period' विचारात घेवून सहयोगी तत्वावर करावयाच्या कराराचा कालावधी नमूद करणे आवश्यक राहील.

२) कारखान्याचा प्रस्ताव आर्थिक दृष्टया सक्षम (Financially Viable) असणे आवश्यक आहे.

३) सहकारी साखर कारखाना सहयोग करण्याच्या प्रस्तावासोबत परिपूर्ण योजना, संबंधीत संस्थेची योजनेत सहभागी होण्यासाठीची लेखी सहमती, वित्तिय संस्थेची लेखी सहमती, संबंधित संस्थेची सनदी लेखापालांकडून [Chartered Accountant] प्रमाणित करण्यात आलेली आर्थिक पत्रके, आयकर विवरण पत्रके, आर्थिक ऐपतदारी प्रमाणपत्र, प्रस्तावित योजनेमध्ये स्विकारावयाची जबाबदारी/ करावयाची गुंतवणुक अशी गुंतवणूक करण्याकरिता उभारावयाचा निधी व त्याकरीता संबंधितांनी मिळविलेली वित्तिय संस्थेची लेखी हमी इ. बाबींचा तपशील प्रस्तावासोबत सादर करणे आवश्यक आहे.

४) कारखाना सहयोग करण्याचा प्रस्ताव मान्यतेसाठी शासनाकडे सादर केल्यानंतर सदर प्रस्तावावर शासन निर्णयानुसार नेमलेल्या समितीने घेतलेल्या निर्णयानुसार नमूद अटी व शर्तीनुसार साखर आयुक्तालयाचे स्तरावर करार करण्यास मान्यता देण्यात येईल. तसेच ज्या कारखान्यास अथवा शासकीय उपक्रमास सहयोगी तत्वावर चालविण्यासाठी द्यावयाचा अंतिम निर्णय झाला अशा कारखान्याने प्राधान्याने शासकीय थकीत देणी भरणा करणे आवश्यक आहे. तथापि, अशी रक्कम एकरकमी भरणे शक्य नसल्यास विहित कालावधीमध्ये रक्कम भरणेबाबत कारखान्याने हमीपत्र द्यावे.

५) सहकारी साखर कारखान्यांनी अधिनियमातील तरतूदीं व उपरोक्त अटी-शर्तीचे पालन न करता परस्पर त्यांचे स्तरावर सामंजस्य करार (MOU) करुन सहयोग करण्याचा निर्णय

घेतल्यास होणारे आर्थिक नुकसान आणि अधिनियमाचे उल्लंघन या बाबतची संपूर्ण जबाबदारी ही संचालक मंडळ आणि कार्यकारी संचालक यांची राहील.

**६. कारखान्यातील कर्मचारी :**

कारखाना सहयोग करणाऱ्या कारखान्यास आकृतीबंधाप्रमाणे कर्मचारी घेण्याची मुभा राहील.

**********************

**शासन शुध्दीपत्रक सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक : ससाका-२०१९/प्र.क्र.१०५/३-स, दिनांक ८.९.२०२० सोबतचे "जोडपत्र- ड"**

**सहकारी साखर कारखान्याकडील आसवणी/ इथेनॉल/ सहवीज प्रकल्प भाडेतत्वावर देणेसाठीच्या अटी/ निकष व कार्यपद्धती (उपप्रकल्पाकरीता) :**

**१. उपप्रकल्प भाडेतत्वावर देण्यासाठी मंजूरी :**

सहकारी साखर कारखान्याने उपप्रकल्प भाडेतत्वावर देणेपूर्वी सर्वसाधारण सभेची पूर्वमंजूरी घेणे आवश्यक राहील.

**२. आसवणी / इथेनॉल / सहवीज निर्मिती प्रकल्प कोणास भाडेतत्वावर देता येईल :**

सहकारी साखर कारखाने **आसवणी / इथेनॉल** / सहवीज निर्मिती प्रकल्प दुसऱ्या सहकारी / खाजगी साखर कारखान्यास किंवा कंपनीस किंवा भागीदारी संस्थेस भाडेतत्वावर देऊ शकतील.

**३. प्रकल्प भाडेतत्वावर देण्यापूर्वी आवश्यक अहवाल :**

३.१) भाडेतत्वावरील प्रकल्पाची आर्थिक व तांत्रिक सक्षमता (Economic & Technical Viability) तपासणे आवश्यक आहे. यासाठी वसंतदादा शुगर इन्स्टिटयूट, पुणे अथवा सनदी लेखापाल (Chartered Accountant) किंवा फर्म यांचा अहवाल घ्यावा.

३.२) सदर आर्थिक व तांत्रिक सक्षमता तपासणाऱ्या यंत्रणेने एनर्जी परचेस ॲग्रीमेंट, कामगार, वित्तिय संस्था आणि इतर येणी देणी, महावितरण कंपनी व महाराष्ट्र एनर्जी डेव्हलपमेंट ॲथॉरीटी (MEDA) यांच्याकडील येणी देणी व अनुदान इ. माहितीचा अहवालात समावेश करावा.

**३.३)** प्रदुषण आणि पर्यावरणाविषयी 'ना-हरकत' प्रमाणपत्राबाबत माहितीचा समावेश अहवालात करावा.

**४. उपप्रकल्पाचे भाडे व अनामत रकमेबाबत :**

४.१) सहकारी साखर कारखान्याने भाडेतत्वावर द्यावयाच्या उप प्रकल्पाच्या क्षमतेप्रमाणे कमीत कमी प्रतिवर्षीचे भाडे निश्चित करावे. सदरचे 'भाडे' भाडेतत्वावर देणाऱ्या कारखान्याने प्रकल्प अहवाल तयार करणाऱ्याच्या सल्ल्याने ठरवावे.

४.२) सदर प्रकल्प भाडेतत्वावर घेणाऱ्याकडून अनामत रक्कम (Deposit) घ्यावी.

**५. प्रकल्पाचे EPA (Energy Purchase Agreement) बाबत :**

सहकारी साखर कारखान्याने सहवीज निर्मिती प्रकल्प भाडेतत्वावर देताना EPA (Energy Purchase Agreement) करारानुसार भाडेकरार कालावधीमध्ये मिळणारा दर विचारात घ्यावा.

**६. कारखान्याचे आसवणी/ इथेनॉल/ सहवीज प्रकल्प भाडेतत्वावर देण्याचा कालावधी :**

६.१) सहकारी साखर कारखान्याचे प्रकल्प भाडेतत्वावर देण्याचा कालावधी किमान ५ वर्ष व कमाल १५ वर्षापर्यंत असावा.

६.२) उभय पक्षांनी भाडेकरार नोंदणीकृत करणे आवश्यक राहील.

**७. प्रकल्प भाडेतत्वावर देताना अवलंबविण्याची कार्यपद्धती :**

७.१) भाडेतत्वावर प्रकल्प देताना ई-निविदा प्रणालीचा (E-Tendering) अवलंब करावा व जास्तीत जास्त किंमतीची निविदा अंतिम करणेत यावी.

७.२) भाडेतत्वावर प्रकल्प देताना सहकारी साखर कारखान्यास संबधित प्रकल्पासाठी दिलेली मान्यता, त्यामधील अटी व शर्ती यांची तपासणी करुन पूर्तता होत असल्याची / झाली असल्याची कारखान्याने खात्री करावी.

**८. प्रकल्पामध्ये करावयाचे भांडवली खर्चाबाबत :**

८.१) आसवणी प्रकल्प/ इथेनॉल प्रकल्प/ सहवीज निर्मिती प्रकल्पामध्ये आधुनिकीकरण आणि विस्तारीकरणामध्ये भाडेतत्वावर घेणा-याने भांडवली खर्च करावयाचा असल्यास प्रकल्प भाडेतत्वावर घेणाऱ्याची जबाबदारी राहील.

८.२) करार संपताच संपूर्ण प्रकल्प जसा आहे तसा हस्तांतरीत करावा लागेल.

**९. शासकीय कर्ज / भागभांडवल / थकहमीशुल्क व इतर देय रकमांच्या परतफेडीबाबत :**

कारखान्याकडील शासकिय कर्ज, भागभांडवल, थकहमी, थकहमी शुल्क, देय FRP यांच्याबाबतचा सविस्तर आढावा घेऊन शासकीय थकबाकी प्राधान्याने देण्यात यावी. त्याबाबतचे हमीपत्र कारखान्याने द्यावे.

**१०. प्रकल्प भाडेतत्वावर दिल्यानंतर वाद निर्माण झाल्यास :**

करारातील अटीनुसार उभय पक्षांमध्ये वाद निर्माण झाल्यास त्याबाबत योग्य त्या प्राधिकरणासमोर दाद मागणेबाबत करारामध्ये स्पष्ट उल्लेख असणे आवश्यक आहे.

*********************

## शासन शुध्दीपत्रक सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक : ससाका-२०१९/प्र.क्र.१०५/३-स, दिनांक ८.९.२०२० सोबतचे "जोडपत्र- इ"

**सहकारी साखर कारखान्यांनी आसवणी प्रकल्प /इथेनॉल प्रकल्प /सहवीज प्रकल्प भाडेतत्वावर घेणेसाठीच्या अटी/ निकष व कार्यपद्धती (उपप्रकल्पाकरीता) :**

**१. उपप्रकल्प भाडेतत्वावर घेण्यापूर्वी मंजूरी :**

१.१) सहकारी साखर कारखान्याने उपप्रकल्प भाडेतत्वावर घेणेसाठी सर्वसाधारण सभेची पूर्वमंजूरी घेणे आवश्यक राहील.

१.२) सहकारी साखर कारखान्याने प्रथमत: भाडेतत्वावर घ्यावयाचा प्रकल्प आर्थिक व तांत्रिकदृष्टया सक्षम असल्याची खात्री करणे आवश्यक आहे.

**२. प्रकल्प भाडेतत्वावर घेण्यापूर्वी आवश्यक अहवाल :**

२.१) भाडेतत्वावरील प्रकल्पाची आर्थिक व तांत्रिक सक्षमता (Economic & Technical Viability) तपासणे आवश्यक आहे. यासाठी वसंतदादा शुगर इन्स्टिटयूट, पुणे अथवा सनदी लेखापाल (Chartered Accountant) किंवा फर्म यांचा अहवाल घ्यावा.

२.२) सदर आर्थिक व तांत्रिक सक्षमता तपासणाऱ्या यंत्रणेने एनर्जी परचेस ॲग्रीमेंट, कामगार, वित्तिय संस्था आणि इतर येणी देणी, महावितरण कंपनी व महाराष्ट्र एनर्जी डेव्हलपमेंट ॲथॉरीटी (MEDA) यांच्याकडील येणी देणी व अनुदान इ. माहितीचा अहवालात समावेश करावा.

२.३) प्रदुषण आणि पर्यावरणाविषयी 'ना-हरकत' प्रमाणपत्राबाबत माहितीचा समावेश अहवालात करावा.

**३. प्रकल्प भाडेतत्वावर घेताना घ्यावयाची दक्षता :**

सहकारी साखर कारखान्याचे प्रकल्प भाडेतत्वावर घेताना करारातील अटी व शर्ती कारखान्याच्या हितास बाधक नसाव्यात. भाडेकरार कारखान्यासाठी आर्थिकदृष्टया तोटयाचा नसावा.

**४. कारखान्याचे आसवणी/ इथेनॉल/ सहवीज प्रकल्प भाडेतत्वावर घेण्याचा कालावधी :**

४.१) सहकारी साखर कारखान्याचे प्रकल्प भाडेतत्वावर घ्यावयाचा कालावधी किमान ५ वर्षे व कमाल १५ वर्ष असावा.

४.२) सहकारी साखर कारखान्यांनी वरील उपप्रकल्प घेण्याबाबत निर्णय झाल्यानंतर उभयपक्षांनी नोंदणीकृत करार करणे आवश्यक राहील.

**५. प्रकल्पाच्या EPA (Energy Purchase Agreement) बाबत :**

कारखान्याच्या सहवीज प्रकल्पाबाबत EPAनुसार (Energy Purchase Agreement) पुढील कालावधीमध्ये मिळणारा दर विचारात घेवून सहकारी साखर कारखान्याच्या आर्थिक परिस्थितीवर होणाऱ्या परिणामांची सविस्तर माहिती तपासणे आवश्यक राहील.

**६. शासकीय कर्ज/भागभांडवल/थकहमी शुल्क व इतर रकमांच्या परतफेडीबाबत :**

६.१) सहकारी साखर कारखान्याकडील शासकीय कर्ज, भागभांडवल, थकहमी, थकहमी शुल्क, देय FRP यांच्याबाबतचा सविस्तर आढावा घेतला जावा.

६.२) सहकारी साखर कारखान्याने आसवणी/ इथेनॉल/ सहवीज प्रकल्प भाडेतत्वावर घेतल्यास मिळणाऱ्या उत्पन्नातून शासकीय थकबाकी प्राधान्याने भरावी. त्याबाबतचे हमीपत्र कारखान्याने द्यावे.

**७. प्रकल्प भाडेतत्वावर घेतल्यानंतर वाद निर्माण झाल्यास :**

करारातील अटीनुसार उभय पक्षांमध्ये वाद निर्माण झाल्यास त्याबाबत योग्य त्या प्राधिकरणासमोर दाद मागणेबाबत करारामध्ये स्पष्ट उल्लेख असणे आवश्यक आहे.

******************************

**शासन शुध्दीपत्रक सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक : ससाका-२०१९/प्र.क्र.१०५/३-स, दिनांक ८.९.२०२० सोबतचे "जोडपत्र- ई"**

**सहकारी साखर कारखान्याकडील बूट (BOOT) तत्वावरील सहवीज निर्मिती प्रकल्प पुन्हा खरेदी करण्यासाठी अटी/ निकष व कार्यपद्धती (उपप्रकल्पाकरिता) :**

**१. सहवीज निर्मिती प्रकल्प खरेदी करण्यासाठी पूर्वमंजूरी :**

सहकारी साखर कारखान्याकडील बूट तत्वावरील सहवीज निर्मिती प्रकल्प खरेदी करण्यासाठी वार्षिक सर्वसाधारण सभेची पूर्वमंजूरी आवश्यक राहील.

**२. सहवीज निर्मिती प्रकल्प पुन्हा कारखान्याने खरेदी करणेपूर्वी :**

२.१) संबंधित सहकारी साखर कारखाना व कंपनी यांनी आपापसात निर्णय घेणेपूर्वी बुट तत्वावरील प्रकल्पाची आर्थिक व तांत्रिक सक्षमता (Economic & Technical Viability) तपासणे आवश्यक आहे. यासाठी वसंतदादा शुगर इन्स्टिटयूट, पुणे अथवा सनदी लेखापाल [Chartered Accountant] किंवा फर्म यांचा अहवाल घ्यावा.

२.२) सदर आर्थिक व तांत्रिक सक्षमता तपासणाऱ्या यंत्रणेने एनर्जी परचेस ॲग्रीमेंट, कामगार, वित्तिय संस्था आणि इतर येणी-देणी, महावितरण कंपनी व महाराष्ट्र एनर्जी डेव्हलपमेंट ॲथॉरीटी (MEDA) यांच्याकडील येणी-देणी व अनुदान याबाबत वस्तुनिष्ठ माहितीचा अहवालात समावेश असावा.

२.३) सहकारी साखर कारखाना ज्या आर्थिक वर्षात 'बुट' तत्वावरील प्रकल्प विकत घेणार असेल, त्या वर्षातील प्रकल्पाची किंमत (घसारा विचारात घेऊन) निश्चित करणे आवश्यक आहे.

२.४) प्रदुषण आणि पर्यावरणाविषयी 'ना हरकत' प्रमाणपत्राबाबत माहितीचा समावेश अहवालात करावा.

**३. EPA (Energy Purchase Agreement) बाबत :**

EPA (Energy Purchase Agreement) बाबत पुढील कालावधीमध्ये मिळणारा दर विचारात घेवून बुट तत्वावरील प्रकल्प विकत घेतल्यानंतर सहकारी साखर कारखान्याच्या आर्थिक परिस्थितीवर होणाऱ्या परिणामांची सविस्तर माहिती तपासणे आवश्यक राहील.

**४. बूट तत्वावरील प्रकल्पातील अटी व शर्तींच्या पूर्ततेबाबत :**

'बूट' तत्वावरील प्रकल्प राबविताना सहकारी साखर कारखान्यास दिलेली मान्यता, त्यामधील अटी व शर्ती आणि सहकारी साखर कारखान्याने ज्या सहकारी संस्थेशी/ कंपनीशी बूट तत्वावरील करार केलेला असेल, त्या करारातील अटी व शर्ती यांची तपासणी करुन पूर्तता झाली असल्याची खात्री करावी.

**५. बूट तत्वावरील सहवीज निर्मिती प्रकल्प कारखान्याने परत खरेदी करणेबाबत :**

ज्या सहकारी साखर कारखान्याने बूट तत्वावर सहवीज निर्मिती प्रकल्प खाजगी कंपनीशी करार करून उभारलेले आहेत, त्यांचेकडून ते परत विकत घेताना वर नमूद मुद्दा क्र. २.३ प्रमाणे प्रकल्पाची किंमत निश्चित करून प्रकल्प खरेदीबाबतचा प्रस्ताव साखर आयुक्त कार्यालयास शासन नियुक्त समितीसमोर ठेवणेसाठी सादर करावा.

**६. शासकीय कर्ज व इतर रकमांबाबत :**

६.१) कारखान्याकडील शासकिय कर्ज, भागभांडवल, थकहमी व थकहमी शुल्क याबाबतचा सविस्तर आढावा घेतला जावा.

६.२) कारखान्याने शासकीय देय रक्कम भरावी.

६.३) सदरची रक्कम कारखान्यास भरणे शक्य नसल्यास कारखाना प्राधान्याने शासकीय रक्कम कशी भरणार याचा तपशील देऊन रक्कम भरण्याबाबत हमीपत्र द्यावे.

**७. प्रकल्प खरेदीच्या कराराबाबत :**

७.१) उभय पक्षांनी प्रकल्प खरेदीचा निर्णय झाल्यानंतर नोंदणीकृत करार करणे आवश्यक राहील.

७.२) करारातील अटीनुसार उभय पक्षांमध्ये वाद निर्माण झाल्यास त्याबाबत योग्य त्या प्राधिकरणासमोर दाद मागणेबाबत करारामध्ये स्पष्ट उल्लेख असणे आवश्यक आहे.

**********************